# शूर नॉर्मन

## एक सत्यकथा




लेखक: **अँड्र्यू क्लेमंटस**

चित्रे व सजावट: **एलेन बायर**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**

# शूर नॉर्मन

## एक सत्यकथा




लेखक: **अँड्र्यू क्लेमंटस**

चित्रे व सजावट: **एलेन बायर**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**

स्टीव्ह मॅक्डोनल्ड्ला आणखी एक

पाळीव प्राणी हवा होता.

म्हणून तो अनाथ प्राण्यांची काळजी घेणाऱ्या
एका 'शेल्टर' मध्ये गेला.



तिथे बरीच कुत्री होती

आणि बरीच मांजरेही.

मग त्याला दिसला नॉर्मन.

स्टीव्ह म्हणाला,

“मला तो हवा आहे!”

‘शेल्टर’ मधले लोक म्हणाले,

“कोणालाच हा कुत्रा नको होता.

तुम्ही त्याला निवडलेत ते बरे केलेत.

आम्ही खुश आहोत.”

नॉर्मन देखील आनंदात होता.



नॉर्मनला त्याचे नवे कुटुंब आणि घर खूप आवडले.



त्याला स्टीव्ह आवडला

आणि ऍनेट देखील आवडली.



त्याला छोटा पॉल पण आवडला.



घरातील दुसरी कुत्री

ल्युसी पण त्याला आवडली.

दिवसभर नॉर्मन

ॲनेट, पॉल आणि ल्युसी

यांच्या मागे फिरत असे.



तो त्यांच्याबरोबर बागेत जायचा.

समुद्रकिनाऱ्यावर फिरायला

देखील त्याला आवडत असे.

एक दिवस

नॉर्मन काहीही वाटेत आले तरी अडखळू लागला.

घरचे त्याला प्राण्यांच्या डॉक्टरकडे

घेऊन गेले.

त्याला तपासून डॉक्टर म्हणाले,

“हा कुत्रा आता हळू हळू आंधळा होत आहे.

यावर काहीच इलाज नाही.”



मग सगळे त्याला घेऊन

घरी आले.



काही मित्र म्हणाले, “बिचारा कुत्रा!

तुम्ही त्याला तरीही

तुमच्याकडे ठेवणार आहेत का?”

ॲनेटने उत्तर दिले,

“नॉर्मन वर आमचे प्रेम आहे.

त्याला काहीही झाले तरी

आम्ही त्याची काळजी घेऊ.”

आंधळ्या कुत्र्याचा सांभाळ करणे

काही सोपे नव्हते.



तो घरातल्या सर्व सामानावर  आपटत असे.

त्याला आवाजाची भीती वाटे.

कोणी त्याच्याजवळ आले  की तो भुंकू लागे.





ल्युसी वयाने मोठी आणि दयाळू होती.

नॉर्मनला मदतीची गरज आहे

हे तिला समजले होते.

ल्युसी त्याच्या अगदी जवळून चालत असे.

त्यामुळे नॉर्मनचे  अडखळणे आणि आपटणे थांबले.

नॉर्मन अजूनही समुद्रकिनाऱ्यावर जात असे.



किनाऱ्यावर झाडे नव्हती.

म्हणून तो कशावर आपटत नसे.

तिथे गाड्या येत नसत

म्हणून त्याला कशाची भीतीही वाटत नसे.

नॉर्मन तिथे खूप पळत असे.

एक दिवस ॲनेट आणि तिची आई

छोट्या पॉलला घेऊन समुद्रकिनाऱ्यावर गेल्या होत्या.

नॉर्मन पण त्यांच्याबरोबर होता.



अचानक नॉर्मन पळू लागला.

तो पाण्यात गेला

आणि पोहू लागला.

मग ॲनेटला काही तरी दिसले.

एक मुलगी पाण्यात बरीच दूरवर गेली होती.

ती बुडण्याच्या बेतात होती

आणि  मदतीसाठी हाका मारत होती.

पण नॉर्मन खेरीज

कोणालाच तिच्या हाका ऐकू गेल्या नव्हत्या.





नॉर्मन तिच्याजवळ पोचल्यावर

तिने त्याचे शेपूट पकडले.

ॲनेटचे नॉर्मनकडे लक्ष होते.

नॉर्मन त्या मुलीला मदत करत होता.

पण तो चुकीच्या दिशेने

पोहत निघाला होता.

ॲनेट जोरात ओरडली,

“नॉर्मन, इकडे ये!”

आता नॉर्मन किनाऱ्याकडे पोहत येऊ लागला.

तो त्या मुलीला ओढून आणत होता!

पण मुलगी आता खूपच दमली होती.

तिच्या हातून नॉर्मनची शेपूट सुटली.

नॉर्मनने त्या मुलीला शोधण्याचा प्रयत्न केला.

तो गोल गोल पोहू लागला.



ॲनेटने त्या मुलीला जोरात ओरडून सांगितले,
“त्याचे नाव नॉर्मन आहे. त्याला हाक मार.”



“नॉर्मन! नॉर्मन!” मुलगी हाका मारू लागली.

ते ऐकून नॉर्मन तिच्याजवळ आला.

मुलीने परत त्याला पकडले.

यावेळी मात्र तिने त्याला घट्ट पकडले.



नॉर्मनने त्या मुलीला

पाण्याबाहेर ओढून आणले.

मग लोकांनी तिला

किनाऱ्यावर आणले.

मुलगी खूप घाबरली होती आणि थंडीने
गारठू लागली होती.

पण आता ती सुरक्षित होती.



नॉर्मनने तिचा जीव वाचवला होता.

नॉर्मन हा पूर्वी कोणालाही नको
असलेला कुत्रा होता.







त्याला दिसत नव्हते

म्हणून  त्याला पाहून लोकांना वाईट वाटत असे.

पण आता त्याच्याविषयी

पुस्तके लिहिली गेली आहेत.

तो अनेकदा टीव्ही वरही दाखवला गेला आहे.

आंधळा असूनही नॉर्मन शूर होता.

दिसत नसले तरीही

तो लोकांना मदत करत होता.

आता ॲनेट नॉर्मनला

हॉस्पिटलमध्ये जाण्यासाठी तयार करत आहे.

तो तिथल्या लहान मुलांना

हसवू शकतो.

आजारी लोकांना त्याला पाहून

बरे वाटते.



नॉर्मन हा खरोखरच एक शूर प्राणी आहे.